ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखालील विद्युत निरीक्षणालयातील अधिकाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलीकडे/अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर, सेवा पुनर्विलोकनाकरिता विभागीय पुनर्विलोकन समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मुविनि-२०१९/प्र.क्र.१६१/ऊर्जा-५**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २४ फेब्रुवारी, २०२०.

वाचा:- सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एलपीएल-२०१७/प्र.क्र.२१/का. पंधरा, दि. १० जून, २०१९.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ च्या नियम १० (४) व नियम ६५ अनुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिकारी यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्ष अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी, त्यांचे सेवा पूनर्विलोकनासंबंधीची कार्यपध्दती व सर्वसाधारण सूचना संदर्भाधिन शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत. त्यास अनुसरुन ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखालील विद्युत निरीक्षणालयातील (१) गट-अ (राजपत्रित) (अतिकालीक वरीष्ठ श्रेणी) ग्रेड वेतन रु. १०, ०००/- व त्यावरील (२) गट-अ (राजपत्रित) (वरिष्ठ वेतनश्रेणी) ग्रेड वेतन ७६०० व त्यापेक्षा अधिक परंतु १०००० पेक्षा कमी संवर्गातील अधिकारी (३) गट-अ (राजपत्रित) (वरिष्ठ वेतनश्रेणी) ग्रेड वेतन ७६०० पेक्षा कमी संवर्गातील अधिकारी तसेच (४) गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकारी यांच्या वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षाची अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी त्यांच्या सेवेत पुढे चालू राहण्याची पात्रापात्रता आजमाविण्याच्या दृष्टीने विहित निकषांच्या आधारे त्यांचे पुनर्विलोकन करुन शिफारस करण्यासाठी पुढीलप्रमाणे ऊर्जा प्रभागातर्गत विभागीय पुनर्विलोकन समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | अ.मु.स./प्रधान सचिव/ सचिव (ऊर्जा) | अध्यक्ष |
| २ | सह/उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (ऊर्जा) | सदस्य क्र. १ |
| ३ | सह/उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (ऊर्जा) | सदस्य क्र. २ |
| ४ | अवर सचिव / कार्यासन अधिकारी (ऊर्जा-५) | सदस्य सचिव |

२. मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई हे विभागातील संबंधित अधिकाऱ्यांच्या सेवापूनर्विलोकनाबाबचा प्रस्ताव वेळोवेळी शासनास सादर करतील. सदर समिती त्यांच्या शिफारशी अंतिम निर्णयासाठी समुचित प्राधिकाऱ्यांना सादर करील. तसेच विभागीय पुनर्विलोकन समितीच्या शिफारशीनुसार जे गट-अ आणि गट-ब चे अधिकारी सेवेत चालू राहण्यास निर्विवादपणे अपात्र ठरणार असतील अशा अधिकाऱ्यांचे पुनर्विलोकन, संदर्भाधीन दि. १०.०६.२०१९ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे सामान्य प्रशासन विभागाच्या "विशेष पुनर्विलोकन समिती" कडून केले जाईल.

३. विद्युत निरीक्षणालयातील गट- अ (राजपत्रित) (कनिष्ठ वेतन श्रेणी) ग्रेड वेतन ७६०० पेक्षा कमी आणि गट- ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सेवापुनर्विलोकनाअंती सेवा पुढे चालू ठेवण्यास निर्विवादपणे

अपात्र ठरलेल्या नोटीस बजावण्यात आलेल्या अधिकाऱ्यांच्या अभिवेदनावर विचार करण्यासाठी पुढीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | अ.मु.स./प्रधान सचिव/ सचिव (ऊर्जा) | अध्यक्ष |
| २ | सह/उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (प्रशासन) | सदस्य |
| ३ | अवर सचिव / कार्यासन अधिकारी (ऊर्जा-५) | सदस्य सचिव |

सदर समिती त्यांच्या शिफारशी अंतिम निर्णयासाठी समुचित प्राधिकाऱ्यांना सादर करील.

४. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि. १०.०६.२०१९ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या कार्यपध्दती व सूचनांनुसार विदयुत निरीक्षणालयातील अधिकाऱ्यांच्या सेवेचे पुनर्विलोकन करण्याबाबत कार्यवाही करण्यात येईल.

५. संदर्भाधिन शासन निर्णयानुसार परिशिष्ट-अ मधील अनुक्रमांक ३ येथे नमूद विभागाप्रमुखांच्या अध्यक्षतेखाली विद्युत निरीक्षणातील विभागीय / क्षेत्रीय कार्यालयातील गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड कर्मचाऱ्यांकरिता विभागाप्रमुखांना पुनर्विलोकन विषयक सल्ला देण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत यशोचित आदेश निर्गमित करण्यात यावेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२४१५४४३०७०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Pundlik Badgeri

Digitally signed by Prashant Pundlik Badgeri
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, serialNumber=ec955e2d360e1fddb6abac58a907419053beeceb5dbac48a78c89c588ff71bef, cn=Prashant Pundlik Badgeri
Date: 2020.02.24 15:49:12 +05'30'

**( प्रशांत पुं. बडगेरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, ३ रा मजला, प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पूर्व), मुंबई-४०००७१.
२. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
३. अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, मुंबई / पुणे / औरंगाबाद / नागपूर.
४. विद्युत निरीक्षणालयातील सर्व अधिकारी (मार्फत मुख्य विद्युत निरीक्षक)
५. निवडनस्ती (ऊर्जा-५)

**प्रत माहितीस्तव,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. उप सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.